श्रीगणराज प्रभूंच्या परमप्रिय अशा चतुर्थी तिथीचे तात्विक स्वरूप आपण प्रथम लेखात पाहिले. ते निर्गुण निराकार तत्वचिंतन वास्तव कथनीय असते. तेच सगळ्या विवेचनाचा आधार असते. मात्र सर्वसामान्य साधकांना, भक्तांना अखंड निर्गुण अनुसंधान असंभव असते. याच कारणाने भारतीय संस्कृतीने सगुण साकार उपासनेला स्थान दिले आहे.
या सगुणोपासनेचा आधार रुपात मूर्ती ही संकल्पना पुढे आली. मूर्तीपूजा हा भारतीय संस्कृतीचा फार चिंतनीय पैलू आहे. चिंतन अमुर्ताचेच (निर्गुणाचे) करायचे आहे. मात्र अमुर्ताच्या चिंतनाचा मार्ग आहे मूर्ती, मूर्ती हे साधन आहे. माध्यम आहे. सोय आहे.
ऑकार रूप परब्रम्ह परमात्म स्वरूपाच्या निर्गुण निराकार गणराज प्रभूंचे नित्य चिंतन संभव नसल्याने त्याच स्वरुपात त्यांचे ध्यान करता येण्यासाठी "गज" मस्तकधारी मोरयाचे रूप प्रगट झाले.

गज शब्द पलटवला की जग होतो. जग सगुण, साकार, सावयव आहे. त्याच्या विपरीत अर्थात निर्गुण, निराकार, निरवयव ते "गज" आणि हेच ज्यांचे ओळखण्याचे साधनरूप मस्तक ते "श्रीगजानन"!
मूर्तीच्या मागे हे कथनीय असते. यात केवळ हत्ती नामक प्राण्याच्या मस्तकाचा हिशोब नसतो ते प्रतिक आहे. "गज" चा उपरोक्त अर्थ चित्रात वा मूर्तीत दाखवता येत नसल्याने "गज" चा लौकिकार्थ स्वीकारत हत्तीचे डोके दाखविले जाते, तो नाईलाज असतो. त्यामुळे साधकाला काही अडचण येत नाही. तो पाहतो "गज" म्हणजे हत्तीचे मस्तक मात्र त्यावेळी चिंतन करतो "गज" म्हणजे निर्गुणत्वाचे. यालाच म्हणतात मूर्तीच्या आधारे अमुतीचे चिंतन.

भारतीय संस्कृतीत सगळ्याच देवतांच्या मूर्त रुपामागे असेच अमूर्त चिंतन अभिप्रेत असते. केवळ देवताच नाही तर त्यांच्या अन्य सर्व उपांगांचेही असेच प्रतीकात्मक मूर्तीविज्ञान आपल्या संस्कृतीत विकसित झाले आहे.

याच स्वरुपात गाणपत्य संप्रदायात देवी चतुर्थीच्याही मूर्तीचे मोठे मार्मिक वर्णन करण्यात आलेले आहे.
श्रीमुदगल पुराणाच्या चतुर्थ खंडात हे चतुर्थी विज्ञान सांगोपांग रीतीने वर्णिले आहे. त्या चतुर्थ खंडाच्या प्रथमाध्यायात चतुर्थीच्या सगुणप्रगटीकरणाचे कथन आले आहे.
भगवान श्री बेह्मदेव आपल्या अवतारकार्य रूप विश्वनिर्माण कार्यास आरंभ करते झाले. चराचर सृष्टीची निर्मिती झाली. जडसृष्टी नंतर ८४ लक्ष जीवयोनिंनी युक्त चैतन्यमयी सृष्टी निर्माण झाली. आता या सगळ्या सृष्टीच्या सुसूत्र संचालनार्थ एक यंत्रणा असावी. स्वयंपूर्ण नियंत्रणाची एक सुविधा असावी असा विचार श्री ब्रह्मदेवांच्या मनात आला. सकलकार्य सिद्धीदात्या श्रीगणराजांची आळवणी करीत त्यांनी अशा शक्तीच्या प्रगटीकरणाचा संकल्प केला आणि त्यांच्या समोर एक दिव्य स्त्री मूर्ती प्रगटली.

श्रीमुदगलपुराणकार वर्णन करतात --
ततस्तस्थ शरीरादवै नि:सृता प्रकृती: परा !
महामाया तिर्थीना सा जननी कामरूपिणी !
चतुष्पंदा तथा दक्ष चतुर्हस्ता सुशोभनाम !
चतुर्मुखयुता वीक्ष्य हर्षितोऽभूत प्रजापति: ! (४/१/२८-२९)

अशा गणेशचिंतनरत अवस्थेत त्यांच्या मनातून पराप्रकृती, महामाया, सकलतीर्थींची जननी देवी चतुर्थी प्रगट झाली.
ती देवी चार पाय, चार हात तथा चार मुखांनी युक्त होती. तिला पाहून श्रीब्रह्मदेव अतीव आनंदित झाले.

तिने निर्माता रुपात श्रीब्रह्मदेवांना पिता समजून वंदन केले. त्यांनी तिला श्रीगणेशोपासनेचा मार्ग दिला. तिने आराधना केली. परिणामरुपात श्रीगणराजप्रभू प्रसन्न झाले व त्यांनी स्वत:च्या प्रिय तिथीत्वासह अन्यतीथीच्या उत्पत्तीची क्षमता प्रदान केली.

या वरदानानुसार चतुर्थीच्या शरीरातून अन्य सर्व तिथी प्रगट झाल्या.

मुखकमलातून प्रतिपदा, नासिकेतून द्वितीया, वृक्षस्थलातून तृतीया, अंगुलीतून पंचमी, हृदयातून षष्ठी, डोळ्यांपासून सप्तमी, बाहुंपासून अष्टमी, उदरातून नवमी, कर्णदेशातून दशमी, कंठापासून एकादशी, पायापासून द्वादशी, स्तनांमधून त्रयोदशी तर अहंकारापासून चतुर्दशी निर्माण झाली. तिच्या मनातून पौर्णिमा व अमावस्या या तिथी निर्माण झाल्या.

अर्थात हे सगळ वर्णन प्रतीकात्मक असते. सगळ्या तिथी चतुर्थीच्या अवयवांमधून निर्माण झाल्या अर्थात त्या अंगभूत असून, अवयव रूप असून, भागमात्र असून परिपूर्ण अंगरूप, अवयवीरूप, पूर्णरूप तिथी आहे चतुर्थी असा त्याचा कथनार्थ असतो.

सोप्या शब्दात अन्य सर्व तिथी, त्या तिथीला केली जाणारी व्रते, उपासना या सगळ्या पेक्षा चतुर्थीव्रताचे महत्व सर्वोपरी हे सांगण्याची ही पौराणिक शैली आहे. सगळ्या अन्य व्रतांनी केवळ एकेका अंगाचाच लाभ होतो मात्र संपूर्ण लाभ हवा असेल तर आचरणीय व्रत आहे "चतुर्थी" हे सांगण्याची ही पौराणिक पद्धती आहे.

चतुर्थीचे स्वरूपही असेच चिंतनीय आहे. तिचे स्वरूपही असेच प्रतीकात्मक आहे. चार पाय, चार हात, चार मुखे अशी स्त्री नसतेच. मग काय आहे या अलौकिक रूपाचे रहस्य.
चार पाय याचा अर्थ चार गती गाणपत्य संप्रदायात श्रीगणराजांप्रती जाण्याच्या चार स्तरांचा विचार केलेला आहे. असत, सत, सम, आणि नेती अशा रुपात त्या चार गतींचा, अवस्थांचा विचार मांडण्यात आला आहे. (अर्थात हा फार विस्तृत विवेचनाचा विषय आहे. ज्यांना अधिक उत्सुकता असेल त्यांनी श्रीमुदगल पुराण कथारूप आणि विष्लेषण ग्रंथमालिकेतील प्रथम व द्वितीय खंड वाचावेत) या चार ही गतींचे, अवस्थांचे प्रतिक आहेत चार पाय.

अर्थात तुरीयावस्थारूप चतुर्थीप्रत पोहचायचे तर या चार गतींच्या वर उठावे लागते. त्यावर चतुर्थी दशा आहे हे सांगण्यासाठी या 'चार' ला 'पाय' म्हटले.

देवी चतुर्थीला चार हात असतात. हात हे कृतीशीलतेचे प्रतिक आहेत. कर्माचे प्रतिक आहे. मनुष्य चार प्रकारची कर्मे करतो. कायिक, वाचिक, मानसिक तथा बौद्धिक. या चारही कृतींनी गणराज उपासना घडावी हे सांगण्याचे प्रतिक आहे चतुर्थीचे चार हात.

चतुर्थीला चार मुखे आहेत. मुखाने आपण पाहणे, ऐकणे, चव घेणे, गंध घेणे तथा स्पर्श अशा पाचही अंगांनी आनंद घेत असतो. अत: शरीरात मुखास सगळ्यात महत्वाचे स्थान आहे.
या सगळ्या आंनदाचे मार्ग रुपात भारतीय संस्कृतीने चतुर्विध पुरुषार्थाचे वर्णन केले आहे. धर्म, अर्थ, काम, मोक्ष, रूप पुरुषार्थाचे वर्णन भारतीय धर्मग्रंथांमध्ये आले आहे. पुरुषार्थ म्हणजे पुरुषाने प्राप्त करण्याच्या बाबी. या चार मार्गाने तो आंनदाचा अनुभव घेत असतो. या चार माध्यमांनी प्रसन्नता अनुभवतो. अत: ही चार मुखकमले आहेत.

अर्थात चार अवस्था, चार कर्मे तर चार आनंदानी युक्त साधकदशा ती चतुर्थी. सगुण जगतात या बाह्यांगांती आनंद घेण्यासाठी बाह्य रुपात चतुर्थी अशी असते. आणि अंतरंगी तिचे स्वरूप गुण, काल, देह, त्रयातीत तुरीयावस्था असते.

अशा स्वरुपात बारा महिन्यात चोवीस चतुर्थी येतात. तथा अधिक मासातील दोन अशा सव्वीस चतुर्थींच्या विविध बावन्न कथा श्रीमुदगल पुराणात वर्णिल्या आहेत. कथा आहेत त्या कथा ? पुढील भागात पाहू . तो पर्यंत
जय गणेश !